**हंगाम २०१६-१७ मध्ये राज्यात केंद्रशासनाच्या व राज्यशासनाच्या योजनांमध्ये झालेल्या तूर खरेदीमधील अनियमिततेची चौकशी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन आदेश क्रमांक:-सपस -२०१७/प्र.क्र.११६ /२४ स**

मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२

दिनांक:- २१ जुलै, २०१७

**शासन आदेश:-**

हंगाम २०१६-१७ मध्ये राज्यात तूरीचे मोठया प्रमाणात उत्पादन झाले आहे. हंगामाच्या सुरुवातीला तूरीसाठी किमान आधारभूत किंमतीपेक्षा कमी दर मिळत असल्याचे निदर्शनास आल्यानंतर सुरुवातीला केंद्रशासनाच्या व नंतर राज्यशासनाच्या विविध योजनेंतर्गत तूरीची खरेदी करण्यात आलेली आहे. बाजारातील तूरीची मोठ्या प्रमाणात होणारी आवक विचारात घेऊन, वेळोवेळी खरेदी कालावधी वाढवण्यात आलेला होता. सदर तूर खरेदीमध्ये अनियमितता झाल्याच्या तक्रारी शासनास प्राप्त झालेल्या आहेत. त्यानुषंगाने प्रस्तुत प्रकरणी चौकशी करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला असून, पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे आदेश देत आहे:-

i. केंद्रशासनाच्या व राज्यशासनाच्या विविध योजनांतर्गत तूर खरेदी केलेल्या सर्व शेतकऱ्यांची (पूर्ण तपशीलासह) यादी उदा. पूर्ण नांव, गांव, सर्व्हे नं., तूरीचा पेरा, तूरीचे उत्पादन, शेतकऱ्याने विक्री केलेल्या तूरीचा दिनांकनिहाय व खरेदी केंद्रनिहाय तपशील, इ. महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळाच्या संकेतस्थळावर (Website) प्रकाशित करण्याची जबाबदारी पणन संचालक, पुणे यांची राहील.

ii. हंगाम २०१६-१७ मधील तूर खरेदीसंदर्भात प्राप्त झालेल्या तक्रारींच्या अनुषंगाने अनियमिततेबाबत चौकशी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्ह्याचे मा. जिल्हाधिकारी यांचेवर याद्वारे सोपविण्यात येत आहे. सदर कामासाठी त्यांना आवश्यक असलेल्या माहितीसाठी संबंधित जिल्ह्याचे सर्व अधिकारी/कर्मचारी सहाय्य करतील.

iii. मा. जिल्हाधिकारी यांना आवश्यक ती मदत करण्यासाठी संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांना सूचित करण्याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ व पणन संचालक, पुणे यांची राहील.

iv. सदर चौकशीत दोषी आढळून आलेल्या व्यक्तींवर नियमाप्रमाणे फौजदारी खटला दाखल करण्यात यावा व त्याचा अहवाल शासनास ३० दिवसांत सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२४१०५३३२४२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Valvi Kalu Gonya

Digitally signed by Valvi Kalu Gonya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op,Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, cn=Valvi Kalu Gonya
Date: 2017.07.24 11:01:25 +05'30'

**( का.गो. वळवी )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा. मंत्री व मा राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई
७. बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई
८. भारतीय जनता पाटी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेकस क्र.१ योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई ४०० ०२०.
९. भारतीय कम्यनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई ४०० ००४.
१०.भारतीय कम्यनिस्ट पार्टी (मार्क्सवादी ), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई ४०० ०१३.
११.इंडियन नॅशनल कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई ४०० ०२५
१२.नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पाटी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१
१३.मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

१४.सर्व महसुल विभागीय आयुक्त,
१५.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.सर्व जिल्हाधिकारी,
१७.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१८. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे,
१९.सर्व तहसिलदार,
२०.सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
२१.सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
२२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई
२३.अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ.पुणे
२४.अध्यक्ष/सचिव, कृषी उत्पन्न बाजार समिती(सर्व)
२५.महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
२६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७.वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
२८. कार्यासन अधिकारी, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२९.निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.